अकृषी विद्यापीठातील शिक्षक -शिक्षकेतर कर्मचारी तसेच अशासकीय अनुदानित / विनाअनुदानित महाविद्यालयातील शिक्षक - शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना धारणाधिकार मंजुरीबाबत स्पष्टिकरण..

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
मंत्रालय, मुबई -४०००३२
शासन पुरक पत्र क्र नियुक्ती २०१०/ प्रक्र ३३७/२०१०/मशि-५
दि. २८/०२/२०११

वाचा : शासन निर्णय क्र नियुक्ती २०१०/ प्रक्र ३३७/२०१०/मशि-५, दि. २३/०८/२०१०

अकृषी विद्यापीठातील शिक्षक-शिक्षकेतर कर्मचारी तसेच अशासकीय अनुदानित / विनाअनुदानित महाविद्यालयातील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना धारणाधिकार मंजुरीच्या संदर्भात शासनाने वरील दि.२३/०८/२०१० मधिल क्र ४ (इ) " शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची किमान ५ वर्षाची सेवा झाली पाहिजे " या मुद्याबाबत शासनाकडे मागविण्यात आलेल्या मार्गदर्शनाच्या अनुषंगाने स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे :-

"अकृषी विद्यापीठातील शिक्षक-शिक्षकेतर कर्मचारी तसेच अशासकीय अनुदानित / विनाअनुदानित महाविद्यालयातील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना धारणाधिकार मंजुरीबाबतच्या शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची एकाच संस्थेतील एकाच पदावर एकाच वेतनश्रेणीत, संस्थेच्या एका महाविद्यालयात असो किंवा अनेक महाविद्यालयात असो, सलग ५ वर्षाची सेवा अगदी तांत्रिक खंडही न पडता झालेली असली पाहिजे तरच धारणाधिकारासाठी विचारात घेता येईल."

हे पुरकपत्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक क्र २०१०३०८१८५९२८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सदाशिव शिवदास)
शासनाचे सह सचिव

प्रत:

१. मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई
२. सर्व कुलगुरु अकृषी विद्यापीठे.
३. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
४. मा. उप मुख्या मंत्री यांचे प्रधान सचिव
५. मा. मंत्री (उ व तं शि ) यांचे खाजगी सचिव.

-:-

D:\lein Snehal Agnihotri.doc

६. मा. राज्य मंत्री (उ व तं शि ) यांचे खाजगी सचिव.
७. मा. मुख्य सचिव.
८. सर्व कुल सचिव, अकृषी विद्यापीठे.
९. सर्व संचालक व विद्यापीठ व महाविद्यालय विकास मंडळ.
१०. मा. सचिव यांचे स्वीय सहाय्यक.
११. सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण.
१२. सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, उच्च वतंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती.